स्वच्छ भारत मिशन २.० अंतर्गत माहिती, शिक्षण व संवादसाठीच्या खर्चाकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वमअ-२०२२/प्र.क्र.५४(१)/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक : ३१ मार्च, २०२२.**

वाचा:

१. वित्त विभागाचे निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१
२. वित्त विभागाचे निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१
३. केंद्र शासनाच्या गृह निर्माण व नगरीकार्य मंत्रालयाचे आदेश क्रमांक १/५/२०२२-SBM-I Computer No. ९१२२४४४, दिनांक २१.०३.२०२२.

**शासन निर्णय:**

देशातील सर्व शहरे पूर्णपणे स्वच्छ, निरोगी आणि राहण्यायोग्य करणे आणि सर्व नागरिकांना स्वच्छ व चांगले आरोग्य आणि स्वच्छ पर्यावरण मिळावे तसेच देशातील सर्व सांविधानिक शहरांना स्वच्छतेची आणि या शहरामधील नागरीकांना घरगुती शौचालयांची सुविधा उपलब्ध करून देणे, या उद्देशाने केंद्र शासनाने “स्वच्छ भारत अभियान (नागरी)” ची अंमलबजावणी सुरु केली होती.

२. स्वच्छ भारत अभियानात सातत्य राखणे व संपूर्ण नागरी भारत कचरा मुक्त करण्याच्या दृष्टीने वैयक्तिक तसेच सामुदायिक/सार्वजनिक शौचालयांकरिताच्या गुंतवणुकीमध्ये सातत्य राखणे, वापरलेले पाणी व मैला यांची प्रक्रिया, विल्हेवाट व पुनर्वापर करणे, सर्व प्रकारच्या घन कचऱ्याचे व्यवस्थापन करणे व जुना साठलेला कचरा, प्लास्टिक कचरा, बांधकाम/पाडकाम कचरा इत्यादींची विल्हेवाट लावणे व व्यवस्थापन करणे करिता आर्थिक मदत करणे इत्यादी गरजा विचारात घेऊन भारत सरकारच्या गृहनिर्माण तथा नागरी कार्य मंत्रालयाद्वारे स्वच्छ भारत अभियान नागरी २.० चा प्रारंभ दिनांक २ ऑक्टोबर, २०२१ रोजी केला आहे. हे अभियान दिनांक ०१ ऑक्टोबर, २०२६ पर्यंत राबविले जाणार असून या अभियानाचा मुख्य उद्देश **“कचरा मुक्त शहरे”** हा आहे.

२. स्वच्छ भारत अभियान (नागरी) २.० देशामध्ये एक अभियान म्हणून राबविण्यासाठीच्या मार्गदर्शक सूचना भारत सरकारच्या गृहनिर्माण तथा नागरी कार्य मंत्रालयाद्वारे (MoHUA) नुकत्याच प्रसिध्द केल्या आहेत. याबाबत देशातील सर्व वैधानिक शहरांमध्ये अभियानाची अंमलबजावणी करावयाची आहे. सर्व शहरांसाठी **"कचरा मुक्त शहराचा"** दर्जा प्राप्त करण्याचा दृष्टीकोन समोर ठेऊन स्वच्छ भारत अभियान-२.० कार्यान्वित केले जाणार आहे. स्वच्छ भारत मिशन २.० अंतर्गत माहिती, शिक्षण व संवादसाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेकरिता रुपये ३९,८५,००,०००/- (रुपये एकोणचाळीस कोटी पंचाऐंशी लाख फक्त) एवढा निधी राज्यास वितरीत केला आहे.

३. स्वच्छ भारत मिशन २.० अंतर्गत माहिती, शिक्षण व संवाद यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस वितरीत करण्याकरिता पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार संबंधित लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदी मधून भागविण्यात यावा.

| अ.क्र | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीत करण्यात आलेला निधी रूपये |
|---|---|---|
| **अ)** | **महानगरपालिका** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७६) स्वच्छ भारत अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७५२) योजनांतर्गत | ७,५०,००,०००/- (रुपये सात कोटी पंन्नास लक्ष फक्त) |
| ब) | **नगरपरिषद** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (७८) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपरिषदांना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७७९) योजनांतर्गत | २८,८०,००,०००/- (रुपये अठ्ठावीस कोटी ऐंशी लक्ष फक्त) |
| **क)** | **नगरपंचायतींना** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९३, नगरपंचायतींना सहाय्य, (००) (०३) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपंचायतींना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७९७) योजनांतर्गत | ३,५५,००,०००/- (रुपये तीन कोटी पंचावन्न लक्ष फक्त ) |

४. सदर निधी आहरित करण्यासाठी राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रकमेचे देयक तयार करून ते अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडे तात्काळ सादर करून सदर निधी आहरित करून धनादेश प्राप्त करून घेण्यात यावा. सदर निधीचे वितरण सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्याबाबतची कार्यवाही राज्य अभियान संचालक यांनी करावी.

५. सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाचे शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ व शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, या दोन्ही शासन निर्णयातील लागू असलेल्या अटींची पूर्तता होत आहे. केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याची खात्री वित्त विभागाचे Sheet No.४१(२०२१-२२) वित्त विभाग/अर्थोपाय या अन्वये करण्यात आली आहे.

६. वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. सदर शासन निर्णयान्वये केंद्र व राज्य शासनाचा एकूण रुपये ३९,८५,००,०००/- (रुपये एकोणचाळीस कोटी पंचाऐंशी लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३१२३५३०८२४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, serialNumber=eeec7a4defed4a9827acaa40b255e88289e62111c82bcdb7dd2fe58860768930, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2022.04.06 15:47:31 +05'30'

**(अजित पालवे)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा .मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा .राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-२, नागपूर.
६. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई.
८. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१०. अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई.
११. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.
१२. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१३. मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१५. निवडनस्ती, नवि-३४